मौजे माळीण, तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे येथील डोंगर खचून बाधीत झालेल्या कुटुंबाचे पुनर्वसन.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)

**शासन निर्णय क्रमांक:-आव्यप्र-२०१४/प्र.क्र.८५/आव्यप्र-२,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:- २४ फेब्रुवारी, २०१५ .

वाचा:- शासन निर्णय क्रमांक:-आव्यप्र-२०१४/प्र.क्र.८५/आव्याप्र-२, दि.०२.०९.२०१४.

**प्रस्तावना:-**

पुणे जिल्ह्यातील आंबेगाव तालुक्यातील मौजे माळीण गावावर डोंगर खचून मोठी आपत्ती उद्भवली. या दुर्घटनेमधील बाधीत व्यक्तीचे पुनर्वसनासाठी जिल्हाधिकारी, पुणे यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरावर विशेष समिती गठीत करण्यात आली आहे. माळीण गावातील दुर्घटनाग्रस्त बाधीत कुटुंबाचे पुनर्वसन करण्याबाबत सन्दर्भाधीन शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता.त्यानुसार आदिवासी विकास विभागामार्फत पुनर्वसन करण्यात येणार होते,या सन्दर्भाधात सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता दिनांक २ सप्टेंबर, २०१४ चा सन्दर्भाधीन शासन निर्णय अधिक्रमीत करुन खालील निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

आता प्रस्तावनेत नमूद बाब विचारात घेऊन या गावाचे पुनर्वसन करण्याच्या दृष्टीने खालील प्रमाणे कामे तात्काळ करणेबाबत निर्णय घेण्यात येत आहे.

| अ. क्र. | कामांचे नांव | कुटुंब संख्या | प्रति कुटुंबास लागणारा खर्च (रुपये लाखात) | एकूण लागणारा खर्च (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | तात्पुरत्या शेडचे बांधकाम | ३० | १.०० | ३०.०० |
| २ | पक्के घरकुल बांधून देणे | ७२ | २.०० | १४४.०० |
| ३ | ८ एकर जमीन खरेदीसाठी लागणारा खर्च प्रति एकर ४ लाख रुपये प्रमाणे | -- | -- | ३२.०० |
| ४ | नागरी सुविधा करिता येणारा खर्च | -- | -- | ५००.०० |
| | **एकूण :-** | | | **७०६.००** |

**२.** याबाबत तात्पुरत्या शेडचे बांधकाम त्वरित करणे, कायम स्वरुपी घरकुले बांधण्याकरिता कार्यपध्दती निश्चित करणे, पुनर्वसित गावामध्ये आवश्यक असणाऱ्या नागरी सुविधा निश्चित करणे इत्यादी सर्व गोष्टींकरिता जिल्हाधिकारी, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

**३.** वरील सर्व कामे ही निश्चितपणे सुरु झाल्यापासून एक वर्षाच्या आत पूर्ण होतील या कालमर्यादेचे जिल्हाधिकारी, पुणे यांनी पालन करावे.

४. उपरोक्त प्रकल्प हा तातडीने राबवावयाचा आहे व त्यामध्ये उद्भवू शकणाऱ्या आकस्मिक बाबींचा विचार करता खर्चाची कमाल मर्यादा रुपये १०.०० कोटी (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतकी निश्चित करण्यात येत आहे.

५. वरील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे लागणारा सर्व खर्च खालील लेखाशिर्षातर्गत हा महसूल व वन विभागामार्फत(मदत व पुनर्वसन) करण्यात यावा.

(१) **तात्पुरत्या शेडचे बांधकाम**- २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, , ९२ राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरीक्त खर्च (९२) (१३) नैसर्गिक आपत्तीमुळे अनुज्ञेय विभागातील आपत्तीग्रस्त पायाभूत सुविधाच्या तातडीच्या स्वरुपाच्या दुरुस्ती/पुनर्स्थापनेसाठी खर्च (२२४५२३१८) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) याखाली रुपये ०.३० कोटी ( अक्षरी रुपये तीस लाख फक्त ) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

(२) **पक्के घरकुल बांधून देणे**- २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य,११३ घरांची दुरुस्ती/पुर्नबांधणी यासाठी सहाय्य ९२ राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकावरील खर्च (९२) (०१) घरांची दुरुस्ती/पुर्नबांधणी यासाठी सहाय्य (२२४५२३२७) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) याखाली रुपये १.४४ कोटी (अक्षरी रुपये एक कोटी चव्वेचाळीस लाख फक्त )फक्त इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

(३) **८ एकर जमीन खरेदीसाठी लागणारा खर्च** -२२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य ,०२ पूर ,चक्रीवादळे,इत्यादी ,१०१अनुग्रह सहाय्य, ९२ राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरीक्त खर्च (९२) (०२) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते व घरे इत्यादी बाधण्यासाठी सपादन केलेल्या/अधिक्रुत केलेल्या जमीनीबद्दल नुकसान भरपाई देणे (२२४५२२०२) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) याखाली रुपये ०.३२ कोटी (अक्षरी रुपये बत्तीस लाख फक्त )इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

(४) **नागरी सुविधा करिता येणारा खर्च** -२२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, (९२) (०२) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते,पाणी पुरवठा, शाळा,चावडी,विद्दुत पुरवठा,नागरीसुविधावरील खर्च (२२४५२२२९) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) याखाली रुपये ५.०० कोटी (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

६. वरील पुनर्वसनाबाबतची बाब ही माळीण गावापुरतीच मर्यादित असल्याने, दुसऱ्या पुनर्वसनासाठी पुर्वोदाहरण म्हणून घेता येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२५११५२१६०४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

Ravindra Madhaorao Mudey

Digitally signed by Ravindra Madhaorao Mudey
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ravindra Madhaorao Mudey
Date: 2015.02.25 12:02:01 +05'30'

**(रविंद्र मा.मुडे)**
शासनाचे कार्यासनअधिकारी

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे
२) जिल्हाधिकारी, पुणे
३) जिल्हा कोषागारअधिकारी,पुणे
४) निवडनस्ती.

**प्रत, माहितीसाठी**

१) मा. मुख्यमंत्री
२) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई-३२
३) सर्व मा.मंत्री, मंत्रालय, मुंबई-३२
४) सर्व मा.राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई-३२
५) सचिव, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव ,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२